कोविड-१९ च्या संसर्गजन्य रोगामुळे सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात होणाऱ्या अर्थव्यवस्थेवरील परिणामाबाबत वित्तीय उपाययोजना करण्याबाबत. (शुध्दीपत्रक-२)

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय शुध्दीपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १६ जून, २०२०.

**पहा :-** १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.६२/कोषा प्रशा-५, दि. ३१ मार्च, २०२०.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल, २०२०.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं २०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४ मे,२०२०.
४) वित्त विभाग, शासन निर्णय शुध्दीपत्रक क्र. अर्थसं २०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. १४ मे,२०२०. (शुध्दीपत्रक-१)

**शासन शुध्दीपत्रक :-**

संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णय, दिनांक ०४ मे,२०२० मधील "अखर्चित रक्कम व स्वीय प्रपंची खात्यांमधील निधी" या शिर्षाखालील परिच्छेद क्रमांक १८ मध्ये पुढील परंतुकाचा समावेश करण्यात यावा:-

"तथापि जिल्हाधिकारी यांच्या अधिपत्याखालील उप विभागीय अधिकारी / उपजिल्हाधिकारी यांचे नावे असलेल्या स्वीय प्रपंची खात्यांमध्ये भूसंपादन अधिनियमातील तरतूदीनुसार भूसंपादनापोटीची नुकसान भरपाई रक्कम / भूसंपादन मोबदला, निवाडा रक्कम, वाढीव मोबदला रक्कम, पुनर्वसन अनुदान, सानुग्रह अनुदान रक्कम व भूसंपादन प्रक्रियेसाठी संपादक संस्थेकडून जमा करण्यात आलेला निधी (उदा. जाहिरात देयक इ.) जमा करण्यात येतो. सदर निधीचे वाटप हे भूसंपादन अधिनियमातील तरतूदीनुसार हितसंबंधित भूधारकांना वाटप करणे कायद्याने बंधनकारक आहे. त्यामुळे सदर निधीचे वाटप हे खर्च या सदराखाली मोडत नसल्यामुळे वरील परिच्छेदातील निर्बंध भूसंपादन प्रक्रियेशी निगडीत सर्व स्वीय प्रपंची लेख्यासाठी लागू राहणार नाहीत."

२. उपरोक्त शासन निर्णय शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक संकेतांक २०२००६१६१५४२०५५६०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Manoj Saunik
Date: 2020.06.16 15:49:59 +05'30'

**( मनोज सौनिक )**
**अपर मुख्य सचिव (वित्त), महाराष्ट्र शासन**

**प्रत -**
१) मा. राज्यपालांचे प्रधान सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,

३) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
४) सर्व मा.मंत्री आणि मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
६) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) सचिव, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
८) सर्व सहसचिव / उप सचिव ( अर्थसंकल्प शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११०००१,
१०) प्रधान महालेखापाल - १ / २ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
११) प्रधान महालेखापाल - १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
१२) प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा/ अपीलशाखा), मुंबई,
१३) प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१४) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
१५) सर्व विभागीय आयुक्त,
१६) सर्व जिल्हाधिकारी,
१७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१९) निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
२०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२१) सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२) निवड नस्ती, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.